**शेतकरी आत्महत्या प्रकरणी उणे प्राधिकार पत्रावर रक्कम काढण्यासाठी कॅशफ्लो वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय-२०१५ / प्र.क्र.१३८/म-७,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :-३० एप्रिल, २०१५

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय-२०१४/प्र.क्र.११४/म-७, दिनांक ०९ मे, २०१४

**प्रस्तावना :-**

शेतकरी आत्महत्या प्रकरणी प्रत्येक पात्र प्रकरणात मृतकाच्या वारसास शासनाकडून रू.१.०० लक्ष (रू.एक लक्ष फक्त) मदत देण्यात येणाऱ्या लेखाशिर्षांतर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी उणे प्राधिकार पत्रावर देयके पारीत करण्याबाबतची सुविधा चालू होती. सदर सुविधा सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

शेतकरी आत्महत्या प्रकरणी वारसांना तातडीने मदत देण्यात येणाऱ्या सहाय्यक अनुदानापोटी मागणी क्रमांक सी-५, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण-०२-समाजकल्याण-१०४- वृद्ध, अपंग व निराश्रीतांचे कल्याण (००) (०३)- आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांच्या वारसांना वित्तीय सहाय्य- ३१ - सहाय्यक अनुदान (२२३५ ३१९५) (योजनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात रू.१७,००,०००/- (रूपये सतरा लाख फक्त) एवढ्या रकमेची तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूद विभागीय आयुक्त यांना **विवरणपत्र "अ"** मध्ये नमूद केल्यानुसार वितरीत करण्यात येत आहे.

२. नापिकी, कर्जबाजारीपणा व कर्ज परतफेडीचा तगादा या तीन कारणांमुळे झालेल्या शेतकरी आत्महत्यांच्या प्रकरणांत विहीत कार्यवाही पूर्ण करून आत्हत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना मदत देण्यात यावी.

३. या प्रयोजनार्थ होणारा खर्च भागविण्यासाठी सदर तरतूद पुरेशी नसल्याने तातडीने मदत देण्यात येणाऱ्या सहाय्यक अनुदानाची देयके सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी उणे प्राधिकार पत्रावर देयके पारित करण्याबाबतची सुविधा सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात सुद्धा चालू ठेवण्याची मंजूरी वित्त विभागाने दिली आहे.

४. मुख्य लेखाशिर्ष २२३५ ३१९५ खाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात उणे प्राधिकार पत्रावर देयके काढून केलेल्या खर्चाचा हिशेब ठेवण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त / जिल्हाधिकारी यांनी कार्यालयातील जबाबदार अधिकाऱ्यावर सोपवावी व त्यांनी डिसेंबर, २०१५ अखेर या लेखाशिर्षाखाली केलेला प्रत्यक्ष खर्च व गेल्या तीन वर्षातील जानेवारी ते मार्च या दरम्यानच्या पात्र प्रकरणांच्या आकडेवारीवर आधारीत सरासरी अपेक्षित खर्च निश्चित करून संपूर्ण वर्षातील खर्चाचा (प्रत्यक्ष + अंदाजित) तपशिल शासनास कळवावा सदर तपशिलाच्या आधारे

विधानमंडळास पुरवणी मागणी / खर्चाचे सुधारीत अंदाज सादर करण्यात येतील व त्याच्या अचूकतेची जबाबदारी विभागीय आयुक्त कार्यालयाची राहील.

५. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीत संदर्भ क्रमांक१६४/२०१५/ व्यय- ९, दिनांक २४.०४.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०४३०१६२५१२८९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash B Surwase

Digitally signed by Prakash B Surwase
DN: CN = Prakash B Surwase, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.30 16:28:46 +05'30'

**(प्रकाश सुरवसे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त
२) सर्व जिल्हाधिकारी
३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
४) महालेखापाल- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
५) महालेखापाल- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
६) संचालक, लेखा व कोषागार, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) उप सचिव (अर्थ-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) उप सचिव (ब-१/२), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) अवर सचिव (म-३/म-११), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) निवडनस्ती म-७, कार्यासन

शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय-२०१५ / प्र.क्र.१३८ /म-७,
दिनांक :-३० एप्रिल, २०१५

**विवरणपत्र- "अ"**

| अ.क्र. | विभागीय आयुक्त तथा नियंत्रक अधिकारी | वितरीत अनुदानाची रक्कम (रू.लाखात) |
|---|---|---|
| १ | कोंकण | ०१.०० |
| २ | पुणे | ०२.०० |
| ३ | नाशिक | ३.५० |
| ४ | औरंगाबाद | ३.५० |
| ५ | अमरावती | ३.५० |
| ६ | नागपूर | ३.५० |
| | एकूण | १७.०० |

*****